सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात, कृषि विद्यापीठांना ०४- निवृत्तीवेतन विषयक खर्च व ३६- सहायक अनुदान (वेतन) करीता अनुदान वितरीत करण्याबाबत (अनिवार्य)....

# महाराष्ट्र शासन

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : कृषिवि-३७२१/प्र.क्र.६५/७-अे,**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.**
दिनांक : २९ डिसेंबर, २०२१.

वाचा :- १) वित्त विभागाचे परिपत्रक क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.०६.०४.२०२१, दि.२४.०६.२०२१ व दि.१४.१०.२०२१.

२) कृषि विभागाचा समक्रमांकाचा शासन निर्णय, दि.०८.०४.२०२१, दि. २९.०४.२०२१, दि.०१.०६.२०२१, दि. ०१.०७.२०२१, दि.३०.७.२०२१, दि.३०.०८.२०२१, दि. २८.०९.२०२१, दि.०५.१०.२०२१, दि.२७.१०.२०२१.

३) नियंत्रक,डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला यांचे पत्र क्रमांक अप्रवि/अंदाज/ अनु वि./१४२१/२०२१ दि.०९.१२.२०२१

४) नियंत्रक, डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषी विद्यापीठ, दापोली यांचे पत्र क्रमांक डॉबासाकोकृवि/लेखा-२/१०४९/२०२१ दि.०३.१२.२०२१

**प्रस्तावना:-**

डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला अंतर्गत लेखाशिर्ष (२४१५ ००४३), ०४-निवृत्तीवेतन विषयक खर्च करीता सन २०२१-२२ या आर्थिक वर्षातील एकूण अर्थसंकल्पीत रु. १०७५३.९५ लक्ष इतक्या निधीच्या ७५ % निधी व ३६-सहायक अनुदान (वेतन) करीता सन २०२१-२२ या आर्थिक वर्षातील आतापर्यंत एकूण अर्थसंकल्पीत रु. १५१७६.५९ लक्ष इतक्या निधीच्या ७५ % निधी उपरोक्त संदर्भ क्र.२ येथील दि.२७.१०.२०२१ च्या शासन निर्णयांन्वये वितरीत करण्यात आला आहे.

तसेच डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली अंतर्गत लेखाशिर्ष (२४१५ ०२४१), ३६-सहायक अनुदान(वेतन) (अनिवार्य) करीता सन २०२१-२२ या आर्थिक वर्षातील आतापर्यंत एकूण अर्थसंकल्पीत रु.१५०६.५७ लक्ष इतक्या निधीच्या ७५% निधी उपरोक्त संदर्भ क्र.२ येथील दि.२७.१०.२०२१ च्या शासन निर्णयांन्वये वितरीत करण्यात आला आहे. कृषि विद्यापिठांच्या मागणीनुसार उर्वरीत निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

सदर शासन निर्णयान्वये, डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला अंतर्गत मासिक वेतन व निवृत्तीवेतन देयके अदा करण्यासाठी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षातील लेखाशीर्ष, मागणी क्र.डी-३, २४१५ कृषिविषयक संशोधन व शिक्षण, ०१ पीक संवर्धन, १२० इतर संस्थांना सहाय्य, (००) (०३) डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठाला सहायक अनुदान (अनिवार्य) (२४१५ ००४३), "०४- निवृत्तीवेतन विषयक खर्च" या बाबीकरीता रु.१०,००,००,०००/- (अक्षरी रुपये दहा कोटी फक्त) व ३६- सहाय्यक अनुदाने (वेतन) करीता रु.१५,००,००,०००/- (अक्षरी रुपये पंधरा कोटी फक्त) इतका निधी त्याचप्रमाणे डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली अंतर्गत मासिक वेतन अदा करण्यासाठी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षातील लेखाशीर्ष, मागणी क्र.डी-३, २४१५ कृषिविषयक संशोधन व शिक्षण, ०५ मत्स्य व्यवसाय, १२० इतर संस्थांना सहाय्य, (००) (०२) डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठाला सहायक अनुदान (अनिवार्य) (२४१५ ०२४१), "३६- सहाय्यक अनुदाने (वेतन)" या बाबीकरीता रु.३,७६,६४,०००/- (अक्षरी रुपये तीन कोटी शहात्तर लाख चौसष्ट हजार फक्त) इतका निधी असे एकूण रु. २८,७६,६४,०००/- (अक्षरी रुपये अठ्ठावीस कोटी शहात्तर लाख चौसष्ट हजार फक्त) इतके अनुदान सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात वितरीत करण्यास व खर्चास शासन मंजूरी देत आहे.

२. सदर शासन निर्णयातील अनुदान हे खालील नमूद अटी व शर्तींच्या अधिन राहून वितरीत करण्यात येत आहे.

१) वरीलप्रमाणे विद्यापीठांना मंजूर करण्यात आलेले अनुदान महाराष्ट्र कृषि विद्यापीठ अधिनियम १९८३, महाराष्ट्र कृषि विद्यापीठ परिनियम १९९०, आणि महाराष्ट्र कृषि विद्यापीठ लेखा संहिता १९९१ मधील तरतूदीप्रमाणे आणि प्रचलित शासन आदेश व विहित कार्यपध्दतीनुसार सक्षम अधिका-यांची प्रशासकीय व वित्तीय मान्यता घेतल्यानंतर विहीत मर्यादेत खर्च करण्यात यावे. केवळ अर्थसंकल्पीय तरतूद आहे किंवा अनुदान वितरीत केले आहे म्हणून खर्च करु नये.

२) सन २०२१-२२ मधील अनुदानाची मागणी करताना, विद्यापीठाने दरमहा १० तारखेपर्यंत योजनानिहाय वितरीत केलेले अनुदान, प्रत्यक्ष खर्च आणि शिल्लक अनुदान याबाबतचा अहवाल सादर करावा. यापुढे अनुदानाची मागणी सादर करताना, पूर्वी वितरीत केलेल्या अनुदानातील शिल्लकीची प्रस्तावित मागणीशी सांगड घालून, प्रत्यक्षात आवश्यक तेवढ्याच अनुदानाची मागणी करण्यात यावी.

३) नियमबाह्य योजना पदे आणि बाबींसाठी खर्च करु नये.

३. विद्यापीठाच्या नियंत्रक आणि इतर संबंधित सक्षम प्राधिका-यांनी उपरोक्त अटी व शर्तींचे काटेकोरपणे अनुपालन करावे.

४. उपविभागीय कृषि अधिकारी, अकोला व उपविभागीय कृषि अधिकारी, दापोली, जि. रत्नागिरी या आहरण व संवितरण अधिकारी यांनी संबंधित उपशीर्षांतर्गत मंजूर केलेले अनुदान कृषि विद्यापीठांचे संबंधित नियंत्रक यांना अदा करण्याबाबत नियमानुसार आवश्यक कार्यवाही करावी.

५. सदरचे आदेश महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका (भाग-१) १९७७ मधील परिच्छेद १४२, १४३, १४४ व १६२ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या शक्तीनुसार व शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक अर्थसं/२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि. १६/०४/२०२० च्या परिपत्रकातील सर्व अटी व शर्तीनुसार तसेच वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्र. ३५७/२०२१/व्यय-१, दि.१५/१२/२०२१ नुसार प्राप्त मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२११२२९१६५८०८५१०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RANJANA PRASHANT GAWARI

Digitally signed by RANJANA PRASHANT GAWARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7ddd52ee3553b8c244fe7de532cffc8c003d3d93113d72813345def842899925, pseudonym=959FFB0E11AA9B8CE20091B91D8ED1BB25336659, serialNumber=FC67C9178071540FBFEA777D63BDA830073B80A4D502CDB86690ADFF4945C4BC, cn=RANJANA PRASHANT GAWARI
Date: 2021.12.29 16:59:42 +05'30'

**( रंजना गवारी )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
२. सदस्य सचिव तथा महासंचालक / सल्लागार (वित्त), महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे,
३. कुलगुरु / कुलसचिव / नियंत्रक, डॉ. पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला,
४. कुलगुरु / कुलसचिव / नियंत्रक, डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली,
५. उपविभागीय कृषि अधिकारी, अकोला/दापोली,
६. जिल्हा कोषागार अधिकारी, अकोला / उपकोषागार अधिकारी, अकोला, जिल्हा अकोला
७. जिल्हा कोषागार अधिकारी, रत्नागिरी / उपकोषागार अधिकारी, दापोली, जिल्हा रत्नागिरी,
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई,
९. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
१०. उप मुख्य लेखा परिक्षक (वरिष्ठ) स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
११. अवर सचिव/कक्ष अधिकारी, कार्यासन २अे / ६अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२,
१२. कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-१ / अर्थसंकल्प - १३), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
१३. कार्यासन ७-अे (निवडनस्ती), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.